कृषी पंप ग्राहकांना वीज बिलात सवलत या योजनेकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत. (लेखाशिर्ष २८०१५६६१)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२४/प्र.क्र. ३९/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ०३ जुलै, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१.४.२०२४

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाची नस्ती क्र.पुरमा २०२४/प्र.क्र ५४ /ऊर्जा-३

**शासन निर्णय :-**

कृषी पंप ग्राहकांना वीज बिलात सवलत या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २८०१-वीज, ०५, पारेषण व वितरण, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०२) कृषीपंप ग्राहकांना वीज दरात सवलत (कार्यक्रम) (२८०१५६६१) या लेखाशिर्षाखाली रु.११५.०० कोटी इतकी मूळ तरतूद अर्थसंकल्पित आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ येथील शासन परीपत्रकान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरणासाठी निर्देश दिले आहेत. त्यानुसार वित्त विभागाने वाचा क्र.२ येथील नस्तीवर दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून अनुसूचित जाती घटक कार्यक्रमातंर्गत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने प्रस्तावित केल्यानुसार अनुसूचित जातीच्या कृषी पंप ग्राहकांना वीज बिलात सवलतीपोटी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत निधीपैकी (२८०१५६६१) या लेखाशिर्षाखालील रु. ७२.८५ कोटी इतका निधी मंजूर लेखानुदानाच्या मर्यादेत महावितरण कंपनीस रोखीने अदा करण्यासाठी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१.०४.२०२४ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१.०४.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ५६८ /व्यय-१४ दि. १०.०६.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०४१२२३२६५१२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2024.07.04 12:35:10 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विज वितरण कंपनी मर्या, प्रकाशगड, बांद्रा(पूर्व), मुंबई
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग